GR-200404081313530001-0100

महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई व प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे बरखास्त करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्र. प्रानिमं-3099/555/प्र.क्र.69/99/13-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 22 डिसेंबर, 1999.

संदर्भ :- 1) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र. प्रानिमं-3099/555/प्र.क्र.69/99/13-अ, दिनांक 11 जून, 1999.
2) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र. प्रानिमं-3099/555/प्र.क्र.69/99/13-अ, दिनांक 14 जून, 1999.
3) सा.प्र.वि. पत्र क्र. प्रानिमं-3099/555/प्र.क्र.69/99/13-अ, दिनांक 2 नोव्हेंबर, 1999.

शासन निर्णय

महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ व सहा प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे उपरोक्त दिनांक 11.6.1999 च्या शासन निर्णयाद्वारे बरखास्त करण्यात आली होती. निवड मंडळाची कार्यालये प्रलंबित काम संपेपर्यंत चालू राहणार असल्याने अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई यांना विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती, मुंबई, सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई यांना विशेष अधिकारी, विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती, मुंबई आणि इतर प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळाच्या सदस्य सचिवांना विशेष अधिकारी, विभागीय आयुक्त या पदनामाने संबोधण्याबाबत दिनांक 14 जून, 1999 च्या शासन निर्णयाद्वारे निर्देश देण्यात आले.

संदर्भाधिन दिनांक 2.11.1999 च्या पत्रान्वये निवड मंडळाकडील शिल्लक काम ज्या टप्प्यावर आहे त्या त्या टप्प्यावर संबंधित निवड समित्यांकडे हस्तांतरित करण्याच्या सूचना सर्व विशेष अधिकारी, विभागीय आयुक्त यांना देण्यात आल्या. संदर्भाधिन दिनांक 2.11.1999 च्या पत्रानुसार निवड मंडळाच्या कामाला स्थगिती देण्यात आली होती.

याबाबत शासन आता असे आदेश देत आहे की, प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे संदर्भाधिन दिनांक 2.11.1999 च्या पत्राद्वारे देण्यात आलेली स्थगिती तूर्त उठविण्यात येत आहे. सर्व विशेष अधिकारी यांनी पुढील आदेश होईपर्यंत त्यांच्याकडील प्रलंबित कामकाज पूर्ण करण्याची कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(य. पां. देसले)
अवर सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
महालेखापाल, महाराष्ट्र-1/2 (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-1/2 (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

(कृ.मा.प.

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

* प्रबंधक, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती, मुंबई यांचे कार्यालय, मुंबई,

विशेष अधिकारी, विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती, मुंबई यांचे कार्यालय, मुंबई,

सर्व विशेष अधिकारी, विभागीय आयुक्त, पुणे, औरंगाबाद, नागपूर, नाशिक, कोकण, अमरावती,

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती.

---

* पत्राने.

---